महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बसेसमधून कर्तव्यार्थ प्रवास करणाऱ्या कारागृहांच्या प्रवास खर्चापोटी सन १९९८-९९ या वर्षात अदा करावयाची रक्कम.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक-एमआयएस-०१९८/९[४४]/पीआरएस-२.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ८ मार्च १९९९.

वाचा:- [१] शासन निर्णय, क्रमांक-एमआयएस-०१९७/१६[८८]/पीआरएस-२, दिनांक ७.८.१९९७.

[२] उपमहाव्यवस्थापक [वाहतूक] महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ मुंबई यांचे पत्र क्रमांक-राप/वाह/पोमोवा/२०५/५८४८, दि. २४.७.९८.

शासन निर्णय:-

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास त्यांच्या बसेसमधून कर्तव्यार्थ प्रवास करणाऱ्या कारागृह कर्मचाऱ्यांच्या प्रवास खर्चापोटी प्रथम ढोबळ रक्कम देण्यात येते व नंतर प्रत्यक्ष प्रवासासाठी एकूण देय रकमेनुसार देय ठरणारी रक्कमही दिली जाते. हीच प्रथा पोलीस विभागातही अस्तित्वात आहे. त्यानुसार सन १९९७-९८ या वित्तीय वर्षात कारागृहाचा प्रत्यक्ष खर्च रु. ३२,०६,२२२/- [रुपये बत्तीस लाख सहा हजार दोनशे बावीस फक्त] एवढा झाला आहे. सन १९९७-९८ मध्ये तात्पुरती ढोबळ रक्कम म्हणून रुपये २६,६०,५३६/-[रुपये सव्वीस लाख साठ हजार पाचशे छत्तीस फक्त] एवढी रक्कम देण्यात आली होती व उर्वरित रु. ५,४५,६८६/- [रुपये पाच लाख पंचेचाळीस हजार सहाशे शहाऐंशी फक्त] एवढी रक्कम अद्याप महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करावयाची आहे. सन १९९७-९८ मध्ये झालेला प्रत्यक्ष खर्च विचारात घेऊन सन १९९८-९९ या वर्षासाठी मोटार वॉरंटसवर कर्तव्यार्थ प्रवास करणाऱ्या कारागृह कर्मचारी व कैदी यांच्या प्रवास खर्चापोटी तात्पुरती ढोबळ रक्कम रु. ३२,०६,२२२/- [रुपये बत्तीस लाख सहा हजार दोनशे बावीस फक्त] एवढी रक्कम महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास द्यावयाची आहे. त्यानुसार कारागृह विभागाकडून एकूण रु. ३७,५१,९०८/- [रुपये सदतीस लाख एकावन्न हजार नऊशे आठ फक्त] एवढी रक्कम महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करावयाची आहे.

उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेता, शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

सन १९९८-९९ या वर्षासाठी प्रवास खर्चापोटी मंजूर करण्यांत येणारी तात्पुरती ढोबळ रक्कम रु. ३२,०६,२२२/- [रुपये बत्तीस लाख सहा हजार दोनशे बावीस फक्त] आणि सन १९९७-९८ या वर्षाचा प्रत्यक्ष खर्च व तात्पुरती ढोबळ रक्कम यातील फरकाची रक्कम रुपये ५,४५,६८६/- [रुपये पाच लाख पंचेचाळीस हजार सहाशे शहाऐंशी फक्त] मिळून एकूण रु. ३७,५१,९०८/- [रुपये सदतीस लाख एकावन्न हजार नऊशे आठ फक्त] एवढी रक्कम महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करण्यास शासन या आदेशाद्वारे मंजूरी देत आहे. ही रक्कम तात्काळ महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करण्यांत यावी.

यासाठी होणारा खर्च "२०५६-तुरुंग-००१-संचालनालय व प्रशासन ००१[एक] कारागृह निरीक्षणालय-२०, इतर खर्च दत्तमत" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा व तो सन १९९८-९९ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यांत यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-सीआर-६१/९९/व्यय-८, दिनांक २२.१.९९ अन्वये निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ गु. ज. कुलकर्णी ]
कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

१] कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२] महालेखापाल, महाराष्ट्र १ व २ [लेखा व अनुज्ञेयता] मुंबई/नागपूर.
३] महालेखापाल, महाराष्ट्र १ व २ [लेखा परिक्षा] मुंबई/नागपूर.
४] अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५] निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६] उपमहाव्यवस्थापक [वाहतूक] महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
७] कोषागार अधिकारी, पुणे.
८] वित्त विभाग [व्यय-८]
९] गृह विभाग, बीयुडी-१/पोल-५ ब.
१०] निवडनस्ती.